महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत
प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या पाणी
पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना अनुदान
वितरीत करण्याबाबत.
कळमनुरी नगर परिषद, जि. हिंगोली

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुनिअ- २०१४/प्र.क्र.३२८/पापु.२२

गो.ते. हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १९ जून, २०१७

**वाचा :**

१. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु-२२,दि. २२.१०.२००८**
२. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ २००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२. २००८**
३. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१४/प्रक्र.९८/पापु-२२, दि.४.३.२०१४**
४. **मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांचे पत्र क्र.मु.अ.(प्र.व्य.स.से.)/तांशा-३/३५९, दि.२.३.२०१४**
५. **शासन निर्णय,समक्रमांक, दि.२८.८.२०१४ व दि.३.६.२०१५**

**प्रस्तावना :**

शासन निर्णय, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ अन्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक ४.३.२०१४ अन्वये कळमनुरी शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु. २०,१५,४५,०००/- इतक्या किंमतीच्या भांडवली कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांनी संदर्भ क्र. ४ अन्वये कळमनुरी पाणी पुरवठा योजनेच्या भांडवली कामांच्या एकूण रुपये २०,१५,४५,०००/- इतक्या ढोबळ किंमतीस तांत्रिक मान्यता दिली आहे. सदर योजनेंतर्गत कळमनुरी नगर परिषदेने सहभागापोटीची संपुर्ण रक्कम संबंधित बँक खात्यामध्ये जमा केली आहे. सदर योजनेकरीता अनुज्ञेय अनुदानापैकी शासन निर्णय, दि.२८.८.२०१४ अन्वये रु.९०६.९६ लक्ष तसेच शासन निर्णय, दि.३.६.२०१५ अन्वये रु.७२५.५६ लक्ष अनुदान कळमनुरी नगर

परिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, कळमनुरी नगर परिषद यांनी एकूण रु. १८००.६६ लक्ष रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे. तसेच, सदर योजनेंतर्गत मंजूर भांडवली कामे ९३.६३% पुर्ण झाली असल्याबाबतचा प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यांनी प्रमाणित केलेला भौतिक प्रगती अहवाल सादर केला आहे. तसेच, सदर योजनेचा प्राचार्य,शासकीय तंत्रनिकेतन, हिंगोली यांनी प्रमाणित केलेला त्रयस्थ तांत्रिक लेखापरीक्षणांतर्गत प्राथमिक पाहणी अहवाल सादर केला असून उर्वरित अनुदान वितरीत करण्याची विनंती केली आहे. सदर बाबी विचारात घेता, कळमनुरी शहर पाणी पुरवठा योजनेस अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान रु.१,८१,३८,५००/- कळमनुरी नगर परिषदेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि. ४.३.२०१४ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या कळमनुरी शहर पाणी पुरवठा योजनेतील भांडवली कामांकरीता अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान रु. १,८१,३८,५००/- (रुपये एक कोटी एक्क्याऐंशी लाख अडोतीस हजार पाचशे फक्त) पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रुपयांत)

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | या अगोदर शासनाकडून वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासना-कडून आता वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| कळमनुरी जि.हिंगोली | २०,१५,४५,००० | १८,१३,९०,५०० | २,०१,५४,५०० | २,०१,५४,५०० | १६,३२,५२,००० | १,८१,३८,५०० |
| | | | | | **एकुण रुपये** | १,८१,३८,५०० |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१९१३३४१५३७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873e6409c70b0a0219d717dd6767c9aec9dd2d61ecf0cc982e9e93ef57312675, cn=Sunil Jairam Tumram
Date: 2017.06.19 14:25:07 +05'30'

**( सु.ज. तुमराम)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

- मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- महालेखापाल-२, नागपूर
- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
- विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
- जिल्हाधिकारी, हिंगोली
- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- अध्यक्ष/मुख्याधिकारी, कळमनुरी नगरपरिषद, जि. हिंगोली
- जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली
- जिल्हा प्रकल्प अधिकारी, (नगरपालिका) जिल्हाधिकारी कार्यालय, हिंगोली
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४,पापु.२०,पापु.२१, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
  निवडनस्ती, पापु-२२.